# बाळमित्र.

तीं मुलें अशीं नीतिवंत पाहून, आणि त्यांची परस्परांविषयीं ममता पाहून, गोपाळरावांस दया आली; त्यांनीं त्यांस पोटाशीं धरिलें, आणि म्हणाले, "तुम्हीं दोघेंही माझीं आवडतीं; दोघेंही मजबरोबर चला."

मग परशुरामास आणि रुक्मिणीस जो आनंद झाला तो काय सांगावा! तीं बापाबरोबर त्या बागांत गेलीं, त्यांत त्यांनीं नानाप्रकारचीं झाडें पाहिलीं. तेथें रुक्मिणी आणि परशुराम आपआपलीं चिरगुटें आटोपून बागांतून चालताहेत, हें पाहून गोपाळरावांस समाधान वाटलें. त्याचें जें फूल त्यांनीं नासलें तें असतें तर त्यापासून त्याला संतोष झाला असता खरा; परंतु त्याप्रसंगीं त्या बहिणभावांमध्यें परस्पर प्रीति, व त्यांचें शाहाणपण पाहून त्यास त्याहून सहस्रगुणित आनंद झाला.



# हट्टी मुलगी.

अगा मुलांनो! ज्या तुम्हां कोणांस वाईट गुणाची खोड लागली असेल, त्या तुमचे सुखासाठीं मी ही पुढची गोष्ट सांगतों, तिजवरून तुमचे लक्षांत येईल कीं, एक वेळ जर मनाचा दृढ निश्चय केला तर, भलेती लागलेली खोड टाकावयाचें अवघड पडत नाहीं.

चंद्री म्हणून एक मुलगी होती, ती सात वर्षेंपर्यंत आपले आईबापांचा केवळ आनंद होती. त्यावयास आपल्या ज्ञानाचा उदय होऊं लागतो. आणि आपणांस बरें वाईट समजूं लागतें; पण चंद्रीविशयीं तें उलटें झालें. तिला जी एक द्वाड खोड लागली, तीस दृष्टांत एक कुत्र्यावांचून दुसरा कोणता मला दिसत नाहीं. जसें एकादें पिसाळलें कुत्रें पुरपुरतें, आणि ज्याचे त्याचे आंगावर पडून चावेच घ्यावयास जातें. कोणी चुकतांना तिचे खेळण्यास हात लावला, तर तिनें त्याकडे वकून डोळे वटारून पाहावें, आणि एक घटिकापर्यंत दांत ओंठ खावे. एकादे अन्यायासाठीं तिला कोणीं हकूच जर धमकाविलें तर तिनें लागलेंच उसळावें; हातपाय आपटावे; आणि रागानें आ-

# बाळमित्र.

सपासचे पदार्थ भुईवर झोंकावे. तिचा बाप, ति-
ची आई, व घरचीं सगळीं माणसें, तिला कंटाळ-
लीं. कोणी आपणास जवळ उभें करीत नाहीं; आ-
ईबापही आपला तिरस्कार करितात, म्हणून तिला
एकादे वेळेस पश्चात्ताप होई, आणि ती डोळ्यांतू-
न आसवेंही गाळी; पण संवय पडतां पडतां म-
ग तिला तो खेद होईनासा झाला; आणि तिचा द्वा-
ड स्वभाव दिवसानुदिवस दृढ होत गेला. दिवाळीचे
एके दिवशीं तिनें आपले आईस एक भरलेली टो-
पली पदराखालीं झांकून खोलींत नेतांना पाहिलें;
तेव्हां ती तिचे मागून खोलींत घुसूं लागली; तों ति-
चे आईनें तिला ढकलून मागें सारिलें. तेसमयीं ति
ला ओफरें येऊन जो तिनें अनर्थ केला, आणि रा-
गानें दाराची फळी जी आपटली, त्यानें सगळें घर
दणदणलें. मग एक घटिका जाऊं देऊन तिचे आ-
ईनें तिला बलावून नेलें. तेसमयीं खोलींत जाऊ-
न तिला फार विस्मय झाला! जिकडे तिकडे दिवे
उजळले आहेत; आणि नानाप्रकारचीं चांगलीं चां-
गलीं खेळणीं खोलीभर मांडून ठेविलीं आहेत. अ-
सें पाहून ती चकित झाली; आनंदानें तिचे तोंडा-

# हट्टी मुलगी.

थांटें एक शब्द निघेना. तिची आई तीस म्हणाली, "चंद्रू, इकडे ये, आणि ह्या चिठ्ठीवर काय लिहिलें आहे हें वाच." त्या खेळण्यांत एक चिठ्ठी होती, ती चंद्रीनें हातीं घेऊन वाचली, तों तींत मोठमोठाल्या अक्षरांनीं हें लिहिलें होतें, "हीं खेळणीं जी मुलगी चांगले गुण करिते तिजकरितां आहेत."

चंद्री लाजून खालीं पाहूं लागली; एक शब्द बोलेना. तिला तिचे आईनें विचारिलें, "कां मुली, हीं कोणासाठीं आहेत बरें?" ती डोळ्यांत आसवें आणून म्हणाली, "हीं माझेसाठीं नव्हत ये."

बरें तर, ती दुसरी चिठ्ठी आहे, पाहा, तींत कांहीं तुझें आहे का?

चंद्रीनें ती हातीं घेऊन वाचिली. "हीं त्या हट्टी मुलीकरितां आहेत. जिचे बुद्धीस आपले द्वाड गुण आले आहेत, आणि जी दुसरी दिवाळी येईपर्यंत ते नीट करण्यास इच्छिते." ती वाचून चंद्रीस रडें कोसळलें; तिनें आईचे गळ्यास मिठी मारिली, आणि म्हणते, "आम्ह चंग, ही मी! ही मी!" तेवेळीं आनंदीबाईसही गहिंवर आला,

कांहीं मुलीचे वाड गुण स्मरून व कांहीं तिचा पश्चात्ताप पाहून, कांहीं पळें जाऊं देऊन ती चंद्रीस म्हणते, "ये मुली, हीं तूं. त्यां बरे गुण धरण्याविषयीं निश्चय केला तो तुझा ईश्वर पार पाडो!"

चंद्री म्हणाली, "नाहीं यये, ह्या वेळेस हीं सगळीं पहिले चिठ्ठींतले मुलीचीं आहेत. तर आतां हीं असूं दे; जंवपर्यंत मी तशी होईन." हें उत्तर एकून आनंदीबाईस बहूत समाधान वाटलें. तिनें तीं सगळीं खेळणीं एका पेटींत घालून, तीस किल्ली करून, चंद्रीस म्हणाली, "मुली, ये ही किल्ली आपले स्वाधीन; आणि तुला जेव्हां वाटेल कीं आतां मी हीं घ्यावयास योग्य आहें, तेव्हां पेटी उघड."

ह्या गोष्टीस दोन महिने लोटले तोंपर्यंत चंद्रीस कधीं ओफरें आलें नाहीं. एके दिवशीं तिनें आईचे गळ्यांत हात घालून पुसलें, "यये, आतां ही पेटी उघडूं?" आनंदीबाईस प्रेमाश्रु येऊन ती तीस म्हणाली, "होय, माझे जिवा, उघड आतां. पण मलां आधीं सांग कीं त्वां आपला स्वभाव नीट करावयास काय उपाय केला बरें?" चंद्री म्हणा-

## हट्टी मुलगी.

लीं, " त्याविषयीं मला मोठे प्रयास पडले; मी नित्य आपले मनांत ती गोष्ट घोकीं, पण सकाळीं संध्याकाळीं देवाची प्रार्थना करीं कीं, हे देवा, माझा निश्चय चळूं देऊं नको." तें ऐकून आनंदीबाईस किती आनंद झाला तो वर्णवत नाहीं. मग चंद्री त्या सर्व खेळण्यांची धनीण झाली, आणि आपले आईचा प्रेमा तिनें आपले कडे संपूर्ण ओढून घेतला.

एके दिवशीं आनंदीबाईकडे एक मुलगी आली होती, ती अशीच हट्टी होती; तिला समक्ष आनंदीबाईनें चंद्रीची गोष्ट सांगितली, ती ऐकून त्यामुळेंस पश्चात्ताप झाला, तेणेंकरून तिनें ही चंद्रीप्रमाणें आपले हट्ट गुण सोडावयाचा, आणि तीप्रमाणें सर्वांस आवडती व्हावयाचा निश्चय केला. तिलाही तसेंच फळ प्राप्त झालें. त्याप्रमाणें आपले आचरणानें चंद्रीनें दुसऱ्यांस बरे गुण लावले, तेणेंकरून ती अधिक सुखी झाली.



# बाळमित्र.

## आशाभंग.

एके दिवशीं, प्रातःकाळीं, अमृतराव बापाबरोबर माहिमास मौज मारावयासाठीं जावयास सजून तयार झाला होता. तेथें जावयाचें तें पूर्वी पंधरा दिवस त्याचे मनांत सर्वदा घोळत होतें. तो नित्यांत लवकर निजून उठत नसे, तो त्यादिवशीं कांबडे आरवणीं उठला, घरचे सगळ्या माणसांस उठविलें; गाडीवानास ताकीद केली, आणि आपण आंघोळ करून तयारींत आहे; इतक्यांत अकस्मात आकाश काळें झालें, अभ्रें दाट आलीं, मोठा वारा सुटला, त्यानें सर्व झाडें डोलूं लागलीं, आणि चोहींकडे धुळीनें दिशा धुंद झाल्या. अमृतराव क्षणक्षणां आंगण्यांत जाऊन आकाशाकडे पाही, फिरून माडीवर जाई. तो तीन तीन पायऱ्या उडे, आणि सोकाजी जो त्याचा बाप त्यास आशा देई कीं, बाबा, कांहीं चिंता नाहीं. हें आतां सगळें जिकडे तिकडे जिरेल. आणि दिशा निर्मळ होतील. मला वाटतें कीं आपण निघालों तरी चिंता नाहीं.

सोकाजीनें मुलाचीं भविष्यें ऐकून तसें केलें नाहीं तो म्हणाला, बाबा, अमळ वाट पाहिली पाहिजे;

# आशाभंग.

इतकें म्हणतो आहे तों विजा कडकडूं लागल्या, आणि मोठा पाऊस कोसळला. तेव्हां अमृतरावास जो पस्तावा झाला तो सांगतां येईना. तो म्हणाला, जळो हा, आजच कशाला लागला! संध्याकाळचा प्रहर दिवसपर्यंत पाऊस पडून मग जिकडे तिकडे निरभ्र झालें, आणि ऊन पडलें, झाडें पानें सगळीं टवटवीत दिसूं लागलीं. मग अमृतराय बहुत दिक्क होऊन राहिला होता तो अमळ हुशारींत आलासा पाहून, बापानें त्यास महालक्ष्मीपर्यंत बाहेर फिरावयास नेलें. तेव्हां हवेची स्वच्छता पाहून, पक्ष्यांचे शब्द ऐकून, जिकडून तिकडून सुगंध येतो आहे तो घेऊन, त्याच्या हृदयास समाधान झालें. त्यास सोकाजी म्हणतो, पाऊस पडल्यानें सर्वत्र काय फेरफार झाला, तो त्वां पाहिलाना? कालच जिकडे तिकडे धुंद, कसें दिसत होतें? उष्मा काय होत होता? सर्व व्याकुळ कसें झालें होतें? आता इतकी जिकडे तिकडे टवटवी दिसावयास काय प्रयोजन बरें? अमृतराय म्हणाला, " आजचा पाऊस."

पाऊस भरून आला म्हणून सकाळीं मी चड-

फडत होता, त्यास ते शब्द उच्चारतां बहूत जारले, तो लज्जित झाला. तेव्हेळेस बापाचे लक्षांत आलें कीं, त्यास ही गोष्ट समजली कीं, जींत बहुतांचें कल्याण ती गोष्ट आपले अकल्याण होऊन ही झाली तरी चांगली. ती करावयाची आपलेल्यांव्यास जर आली तर मोठे होंसेनें करावी, चडफडूं नये.

---

# अंतिक.[+]

## नाटक एक अंकी.

### पात्रें

| | |
|---|---|
| श्रीपतराव राजा... | विजयी होऊन आपले राजधानीस आला आहे. |
| सगुणाबाई शिरकी... | सरपाग्याची स्त्री. |
| हरबाजी... | गाड्यांचा नाईक – हा तिचा वडील मुलगा. |
| शामराव... | अंतिक – तिचा धाकटा मुलगा. |

---

+ अंतिक म्हणजे जवळचा चाकर.

अंतिक.

दलपतराव. . . सरशिलेदार— तिचा भाऊ.

विद्याधरपंडित. . . . . . शाळागुरु.

संताजी. . . . . . . खिजमतगार.

स्थळ, राजाचा वाडा



प्रवेश १,

राजा आणि अंतिक.

( राजा आपले माहालांत पलंगावर निजला आहे; त्याचे बाहेरचे खोलींत अंतिक एके बांकावर निजला आहे.)

राजा— (पाहांटेस उठतो.) आहा! आज मला निद्राशी वाटली. हिला स्वस्थपणाचें सुख म्हणावें. येथें यांके नोबती यांचा उपद्रव नाहीं. (तो घड्याळ पाहातो ) काय वीसच घटिका रात्र गेली?, नाहीं, अधिक असावी. मला वाटतें कीं मी व रा प्रहरावर निजलों. अंतिका! अरे अंतिका!

अंतिक — (अर्धा जागा उसकून बसतो. आणि पुनः पडतो.) औं! कोण हाक मारितें ? पतों.

राजा— तिकडे कोणी आहे कीं नाहीं रे? काय, कोणी बोलत नाहीं?

अंतिक— (कुशीस वळतो आणि जांभई देतो) आहा! काय झोंप लागली होती!

राजा— कोणी बोलताहेसें मी ऐकतों. कोण आहे तें? (तो दिवा फिरवितो आणि पुढें जाऊन अंतिकास पाहातो.) काय! हें मूल येथें एकटेंच! ह्यानें माझी चौकी करावी कीं मीं ह्याची? ह्या खिजमतगारांचे ज्ञानास काय म्हणावें?

अंतिक— (अर्धा जागा उठतो आणि डोळे चोळतो.) महाराज!

राजा— ऊठ ऊठ, मुला, तुझे घड्याळांत किती वाजले आहेत ते सांग; माझें बंद झालें

अंतिक— (बांकास धरून उभा राहातो, अर्धा निजेंतच आहे.) औं! काय महाराज?

राजा— (हंसतो) तूं अजून निजेंत आहेस? आहा! काय ध्यान! असें चित्र काढलें तर चमत्कारिक दिसेल. मुला, तुझे घड्याळांत किती वाजले ते सांगशील?

अंतिक— (डोळे चोळतो) घड्याळ, महाराज? मला

# अंतिक.

क्षमा करावी; तें मजजवळ नाहीं.

राजा— तूं निर्जंत बोलतोस, कीं तुझे जवळ खरेंच घड्याळ नाहीं?

अंतिक— माझे जवळ घड्याळ कधींही नव्हतें.

राजा— नव्हतें? तुझे बापानें, तुला येथें घड्याळावांचून पाठविलें? तुझ्यासारिख्याजवळ तर घड्याळ जरूर असावें.

अंतिक— माझा बाबा, आहा! जर तो जिवंत असता—

राजा— तुला बाप नाहीं तर?

अंतिक— मी जन्मास आल्याचे आधींच तो मेला. मीं त्यास पाहिलें देखील नाहीं.

राजा— बाप नाहीं तर आणखी कोणी तुला वडील असावें, त्यानें किंवा तुझे आईनें तुला घड्याळ द्यावें.

अंतिक— माझी आई महाराज? आहा! ती तुम्हांस ठाऊक नाहीं! ती फार दरिद्रानें पिडली आहे; तिजजवळचें सगळें तिनें मजकरितां खर्च केलें; घड्याळ घ्यावयास तिजकडे पैसे नाहींत.

राजा— आणखी कोणी तुझे वडील आहे कीं नाहीं?

अंतिक— माझा मामा आहे, महाराज.

राजा— (हंसतो) विश्वांत फार मामे आहेत. पण, तुझे मामाचें नांव काय?

अंतिक— तो आपले हुजूरपागेवर असतो.

राजा— खरें, मला स्मरलें; त्यानेंच तुला मजपाशीं आणिलें होतें. आतां माझे मुला, तूं ही मेणवत्ती घे, आणि समोरचे खोलींत जा; तेथें दोन घड्याळें टांगलेलीं आहेत, आरशाचे दोहीं बाजूंस; त्यांतून उजवेकडून आण. खबरदार हो, मेणबत्तीची जोत फशास लावून घरपेटवशील नाहीं तर.— जलदी कर!

अंतिक— होय महाराज, (तो घड्याळ आणावयास जातो.)

---

## प्रवेश २,

### राजा.

काय चांगलें मुलगें आहे! काय त्याचा सरळपणा! असा एखादे थोर मनुष्यांत असता, आणि

## अंतिक.

तो मनुष्य जर माझा मित्र असता, तर काय पाहिजे होतें! पण हा नाहान फार, मुला याचा उपयोग नाहीं, मी याला याचे आईपाशीं पाठवितों.



## प्रवेश ३.

## राजा आणि अंतिक.

अंतिक — (एके हातांत मेणबत्ती, आणि दुसरे हातांत घड्याळ घेऊन.) महाराज तीन घटिका रात्र आहे.

राजा — तर! माझा तर्क खोटा नव्हे; आतां लवकर च उजाडेल. (अंतिकाकडून घड्याळ हातीं घेऊन.) पण, मी तुला आणावयास सांगितलें तें हें नव्हे; हेंच उजवेकडे होतें?

अंतिक — उजवेकडे हेंच होतें, महाराज.

राजा — बरें तर, हेंच जरी होतें तरीं, जर तुला आपलें हित समजतें, तर दुसरें आणितास; कांकीं हें हिरेजडित आहे, तुझेमारिखे मुलास वांळगावयास योग्य नाहीं; पण हें तूं लोभानें आणिलें

असशील, अथवा जे अधिक आशा करून सग-
ळेंच गमावितात, त्यांसारिखें करावयास गेला अस-
शील; मला खरेंच सांग.

अंतिक — महाराज काय बोलतात तें मी समजलों ना-
हीं.

राजा — तर मी समजावितों. डावें उजवें काय तें तुला
समजतें?

अंतिक — (फिरफिरून एके हाताकडे पाहून दुसरे हा-
ताकडे पाहातो.) डावें आणि उजवें, महाराज?

राजा — (त्याची पाठ थापटतो.) बरें मुला, तें असो;
जा, धांव, पहिल्यानें आपले मामास येथें बलावून
आण.

---

## प्रवेश ४

### राजा.

काय भलें! काय मनोहर मूल आहे हें! हें ही म-
ला दुसरें कारण होतें कीं, त्यास त्याचे कुटुंबांत पा-
ठवावें. कांकीं राजदरबार हें बद्धिभ्रष्ट व्हावयाची

अंतिक.

जागा; येथें राहून त्यानें विपडूं नये. खरेंच, मी त्यास त्याचे घरीं पाठवीन हें चागलें. पण जर त्याची आई फार दुर्बळ आहे, त्याचें संरक्षण करावयास समर्थ नाहीं, तर त्यानें कोठें जावें? मी प्रथम त्या गोष्टीचा शोध करितों; वरें, दलपतराव मला सर्व सांगतील.



प्रवेश ५

राजा आणि अंतिक.

**अंतिक** — (येऊन सांगतो) माझा मामा येतो आहे महाराजांपाशीं.

**राजा** — तूं असा कां? तूं गुंगलेला दिसतोस. तुला काय झोंप येते, मुला?

**अंतिक** — होय महाराज, येते आहे खरी अमळ.

**राजा** — तर जा मातक्यानें, आपले बांकावर नीज. मी तुझेसारिखा मुलगा होतों, तेवेळेस मला नीज किती गोड लागत होती, तें मला ठाऊक आहे. जा, स्वस्थ नीज; मी तुला आज्ञा देतों. (अंतिक

जाऊन बांकावर निजतो.)

---

## प्रवेश ६.

### राजा, दलपतराव, आणि अंतिक.

(अंतिक निजला आहे.)

दलपत० — महाराज, आपला सेवक आला आहे.

राजा — आंत या दलपतराव; कां, मीं तुम्हांकडे धाकटा बलायणीकरी पाठविला होता तो कसा आहे? तो माझे हुजूरचाकरीस उपयोगी आहेना?

दलपत० — (गाल खाजवितो) खरें महाराज, तो अमळ लाहान खरा.

राजा — अथवा घोड्यावर स्वार होऊन माझे कामगिरीस जावयास?

दलपत० — मग तो परत येईल कशास.

राजा — अथवा मजजवळ येथें रात्रीस चौकी करावयास?

दलपत० — (किंचित् हांसून) होय, जर महाराज जागे असणार नाहींत तर.

# अंतिक

राजा —. तर पाहाकीं; मी. ह्या मुलास घेऊन काय करावें? कांहीं नाहीं, हें स्पष्ट दिसतें. तर अशा मुलास जें तुम्हीं मजपाशीं आणिलें, तें त्यानें माझी चाकरी करावी, ह्या अर्थावर आणिलें नाहीं; मी त्याचा भाग्योदय करावा ह्यासाठीं, आणिलें मला वाटतें. तुम्हीं सांगितलें कीं, ह्याचे भाईच्यानें ग्राम पाळवत नाहीं; ती काय इतकी दारिद्र्यानें पिडिली आहे?. खरेंच सांगा.

दलपत. — ( छातीवर हात देऊन ) होय महाराज, ह्यांत असत्याचा लेश नाहीं.

राजा — कोणत्या कारणामुळें बरें?

दलपत. — ह्या मागचे लढाईमुळें. ह्या लढाईंत कितीएक भाग्यवान झाले, कितीएक धुळीस मिळाले. ह्याचे आईचें काय जें होतें त्यांतलें कांहींच राहिलें नाहीं, लुटून, जाळून, पोळून, फोडून, तोडून सर्व गेलें. त्यावर आणखी तिला पंचाइती भांडावयाच्या लागल्या. कां तर लढाईच्या मागून त्या येतातच, जशी दुष्काळामागें जरीमरी. पण इतके गोष्टीनें मात्र ती दैववान आहे कीं, तिचीं मुलें मोठीं होऊं लागलीं आहेत. धाकटा हा, आपला अंतिक

आहे; व मोम्याची गाव्यांत असामी आहे. आतां ती आपले कसेही दिवस काढील.

राजा— महाविपत्तीनें काढील ह्यांत भ्रांत नाहीं.

दलपत०— खरें महाराज. (अमळ उदासीनपणानें) ती एका गांवढ्यांत जाऊन राहिली आहे; तेथें एकटीच असते. मी तिजकडे जात नाहीं. मी तिचा भाऊ, तिची विपत्ति माझ्यानें पाहावत नाहीं.

राजा— तुम्ही तिचे भाऊ प्रत्यक्ष?

दलपत०— होय महाराज, भाऊपणा देवीं आला आहे खरा.

राजा— (श्वास धिक्कारून) देवीं आला आहे! आणि तुम्ही तिला भेटावयास जात नाहीं? मी समजलों रावजी. तिची विपत्ति पाहून तुम्हांस लाज वाटेल, आणि कदाचित् तुमचे मनास वाईट वाटलें तर, तुम्हांवर कांहीं खर्च पडेल. (दलपतराव घाबरतात.) तुमचे बहिणीचें नांव काय?

दलपत०— सगुणाबाई शिरकी, महाराज.

राजा— (विचार करितो.) सगुणाबाई शिरकी! रणधीरराव शिरके आपले लष्करचे सरपागे होते नव्हे?

दलपत०— होय महाराज.

# अंतिक

राजा.— ते पहिले लढाईंतच पडले नव्हे ?

दलपत.— खरें. ते ह्या मुलाचे बाप महाराज. बहूत सचवंटीचे मनुष्य; आणि मोठे शिपाई होते, ते हलुयास गेले तेव्हां जसें कोणी म्हणेल कीं, मेजवानीस जाताहेत. त्यांस मिंद्राची च्याती होती.

राजा— मला त्यांचें स्मरण चांगलें आहे; आणि मी इच्छितों कीं—

दलपत.— (जवळ जातो) महाराज काय इच्छितात?

राजा— त्यांचे बायकोशीं बोलावें.

दलपत.— तें आज्ञा झाली तर त्यासणी करितां येईल ती मस्कत शहरांत आहे.

राजा— ती येथें आहे? आणवा तिला; नवकर तिला येथें येऊंद्या; मी तिशीं बोलून तिचें मुलगें तिचे स्वाधीन करणार.

दलपत.— महाराज—

राजा— तुम्ही तें मला मांगूं नका; जा लवकर.

दलपत.— आज्ञा, महाराज (तो बाहेर जातो.)



# बाळमित्र.

## प्रवेश ७,

## राजा आणि अंतिक.

(अंतिक निजलेला)

राजा— काय! तिची अशी दशा झाली! केवढा अनर्थ हा! या लढाईमुळें किती लोक विपत्तींत पडले असतील! इतकें बरें आहे कीं, मीं होऊन लढाई उद्भविली नाहीं. गत्यंतर नाहीं म्हणुन मला तरवार धरणें प्राप्त झालें. (तो उठतो आणि इकडून तिकडे फिरून अंतिकाचे बांकाकडे उभा राहातो.) गोडकर मुलगें! कसें स्वस्थ निजलें आहे! जसें कोणी म्हणेल, निद्रेस समाधि लागली आहे. हा आपले मनांत समजत असेल कीं, मी आपले आमाचे घरीं आहें; मला येथें कोणाची अडचण नाहीं. आहा! केवळ सरळ भाव तो हा! (पुन. फिरतो) याची आई! ती जर दलपतराचासारिखी असली तर मला तिचें कांहीं मनास आणावयास कारण नाहीं. पण प्रथम तिचें स्वरूप ओळखावयास मी तिला आधीं पुसून पाहीन; आणखी मग— मग मला काय कर्तव्य तें करीन. (तो बांकाशीं ओ-

# अंतिक.

णवून मुलाकडे न्याहाळून पाहातो, तों त्याचे खि-
शांतून किंचित् बाहेर निघालेलें एक पत्र त्याचे दृ-
ष्टीस पडतें.) पण हें काय आहे? (तो पत्र घेऊन
उघडतो, आणि लिहिणाराचें नांव वाचतो, तों म-
गुणाबाईची सही पाहून ह्मणतो,) हें याचे आई-
नें पाठविलें आहे. मी वाचूं हें? कांकीं मी तिचें स्व-
रूप जाणावयास इच्छितों. तीं आपले लेंकराशीं कृ-
त्रिम करणार नाहीं; बरें, पाहूं या. (तो वाचतो)
" माझे परमप्रिया मुला"
" तुझे सारिखे मुलास एखीं पत्र लिहिणें अवघड.
परंतु त्वां मला पत्र लिहावयास आळस केला नाहीं;
आणि तेंही चांगलें नांव लिहिलें आहे. ही तुझी मजविषयीं
आस्था पाहून माझे प्रत्ययास आलें कीं, मजवर तु-
झी भक्ति आहे; ती पाहून मी तुझी उपकारी आहें.
तूं मला लिहितोस कीं, तुझे मामानें तुला राजेसाहे-
बांकडे प्रविष्ट केलें आहे; ते तुजवर लोभ करिता-
त; ते बहुत थोर, बहूत शांत आहेत; आणि तुझें
ही मन त्यांवर फार लोभवतें." (तो मुलाकडे पाहा-
तो.) काये, माझे गडया! त्वां असें आपले आ-
ईस लिहिलें होतें? तर तूं मजवर लोभ करितोस

म्हणून मी तुजवर करितें, ह्यांत कांहीं मी विशेष करीत नाहीं." माझे मुला, तूं त्याची कृपा संपादि तोस, ही गोष्ट चांगली करितोस; कांकीं त्यांचे साहित्यावांचून तुला ह्या लोकीं अन्यगति नाहीं. तुला बाप नाहीं; आणि जरी आई आहे, तरी त्यासाठीं तुझी उणी कींव करावी असें नाहीं. मीं तुझें संगोपन करावें हें देवानें माझे हातीं ठेविलें नाहीं. तें मला रात्रंदिवस बहूत व्यथा करितें. माझे सर्वा विपत्तींमध्यें ही माझी विपत्ति मोठी आहे. जेव्हां मी आपले एकटीकडे पाहातें, तेव्हां मला फार संकट वाटत नाहीं; पण जेव्हां तूं माझे मनांत येतोस, तेव्हां माझें हृदय फुटतें, आणि आसवें रपकत नाहींत." येथें बहूत कोमळपणा आणि चित्ताचा बहूत आर्द्रपणा दिसतो; ही चांगली आई आहे; अशीच जर चांगली बायको असली— पण ती कां नसावी? आहेच ह्यांत मला संशय नाहीं. "माझ्या लाडक्या, काय करूं; माझे इच्छेप्रमाणें तुला मी अभ्यास शिकवयाचे मार्गास लावावयास शकत नाहीं. मीं निरुपाय होऊन येथें एकांतवासीं पडलें आहें. पण इतकें करीन कीं, मी तुला ममतेनें आणि माझे मना

अंतिक.

पासून, वारंवार चांगला उपदेश करावयास चुकणार नाहीं, आणि जेव्हां माझे शब्द तुजकडे पोहोंचतील, तेव्हां ते तुला सन्मार्गच दाखवितील. तूं आजपर्यंत माझे मनाप्रमाणें वागलास, तर त्याची ही खूण, तूं हें माझें पत्र आपलेबरोबर नित्य बाळगीत जा. दुसरें मी तुला काय देऊं?" (अंतिकाकडे पाहातो.) हा आईचे आज्ञेंत वागतो हें त्यावरून सिद्ध होतें.— "तूं मजकडून जाऊं लागलास, ते वेळेस मीं तुला आपल्या आसवांनीं नाहाणून जो उपदेश केला होता, त्यास व तुझे स्वधर्मास त्वां चुकावें असा जेव्हां प्रसंग तुजवर पडेल, तेव्हां तूं हें पत्र स्मर; हें उघड; हें वाच; आणि मनांत आण कीं, माझी आई आहे, तिनें माझे आशेवर मात्र जीव धरिला आहे, आणि एकांतवासीं काळ काढीत आहे." तिनें माझे आशेवर मात्र काय? ह्याला दुसरा भाऊ नाहीं? "आणि विचार कर कीं, मी कुमार्गीं गेलों, असतां ती दुःखानें प्राण सोडील, मग असें होईल कीं, जें हृदय इहलोकींचे सगळे पदार्थांपेक्षां मला अधिक चाहात होतें, त्यास मीं करारीनें खोंचलें." ती खरें म्हणते, मूळ

द्दाड निघालें म्हणजे आईबापांस असेंच होतें. त्यानें बिघडावें असें हें स्थळ खरें. असें असतां ति- नें त्यास येथें कां पाठवावें बरें? "तुजविषयीं म- ला कोणतेही गोष्टीची शंका येऊन, किंवा तुजवर माझा अविश्वास होऊन, मी असें म्हणतें असें ना- हीं. तुझें आचरण पाहून माझी खातरी होते कीं, तुजपासून वांकडी गोष्ट कदापि व्हावयाची नाहीं. पण तुझे भावाचे गुणांनीं मला फार रडविलें; म- ला वाटतें कीं, तूं माझी काकळूत जाणून तसा मा- झे दुःखास कारण होणार नाहींस." असें आहे काय? त्याचा वडील भाऊ? गाडदी? त्याविषयीं मला आणखी चांगलें समजून घेतलें पाहिजे. "त्वां सदां माझी मर्यादा ठेविली; तुझें चरित पाहून म- ला आनंदाश्रु येतात, हें मी तुला खरेंच सांगतें; त- र मुला, त्वां असेंच चालावें, भलें व्हावें; मग तु- झी आई कशाही दरिद्रांत असो, कशी ही दुःखी असो, सर्व विपत्ति विसरेल." ही बायको थोर दि- सते; असें नसतें तर, विपत्तींत हिची बुद्धि नीच झाली असती; पण ती उंचावली आहे. ही सा- ध्वी आहे. "तुझे पत्रांचे शेवटीं तूं मला लिहितो

## अंतिक.

मंडळीं, माझे वगैरेंच्या सर्वांस पडल्याळ आहेत. ह्यावरून मी जाणलें कीं, तुलाही एक असावें, पण तूं तितकेंच लिहून उगा राहिलास, हा तुझा संकोच पाहून मी आनंद पावलें. मी दैवहीन, म्हणून तुला एक पाठवावयास शकून नाहीं; मी दरिद्री हें तुला सर्व ठाऊक आहे, म्हणून मला क्षमा कर. कांहीं कामामुळें मला राजधानीस यावयाचें पडतें आहे; माझे जवळ थोडके पैसे आहेत ते वाटखर्चास पाहिजेत, तो खर्च अगत्याचा, नाहींतर कटका नाहीं. पण माझें वचन घेकीं, माझें चालिपर्यंत मी तुझी इच्छा पुरवीन, आणि जर तुला जें व्हावें तें यावयास मला सामर्थ्य नसलें तर मी तुला वरी बुद्धि देण्यास कधीं अंतर करणार नाहीं. पुनः त्वां लवकरच माझे दर्शीस पडावें अशी इच्छा करितें, हे आशीर्वाद." ह्या बायकोनें विपरीत असें असूं नये. मी हें पत्र घेऊन माझे बायकोस दाखवितों. पण नाहीं, हें ह्या मुलाचें धन; मी ह्याचें कसें हरण करूं? (तो पुनः तें पत्र त्याचे आंगरख्याचे खिशांत घालितो.) काय स्वस्थपणानें हा अजून निजला आहे! (मुलास हातीं धरितो.) मुला! ऊठऊठ

(अंतिक उठतो आणि कांहीं वेळ त्यांकडे पाहातो.) माझे जिवाची आण; हा मुलगा मनोहर आहे! चल माझे गड्या, आतां ऊठ, दारीं दिवस फार आला, ऊठ.

अंतिक— (हळूच उठतो.) होय महाराज.

राजा— तूं अझून निजेंतच आहेस? चल, माझे खोलींत जा; (तो जातो.) दिवे मालीव, आणि दार लावून घे— झालें? आतां जेथून घड्याळ आणिलें तेथें जा; इकडून, ह्या वाटेनें, लवकर; नीट जा, आणि तिकडू परत ये. कां आतां पुरता जागा झालासना?

अंतिक— होय, महाराज.

राजा— आतां सांग मला, तुला पत्र लिहितां येतें कीं?

अंतिक— होय महाराज, लिहावयास बसतों असतां लिहितों. मीं दोन लांब लांब पत्रें लिहिलीं आहेत.

राजा— आपले आईस लिहिलीं वाटतें?

अंतिक— (संतोषानें) होय महाराज. माझे आईस.

राजा— मी तिची गोष्ट बोलतों, तेव्हां तुझे डोळ्यांत आनंदाचा टवटवी दिसते, मुला; (एकीकडे दारिद्र-

दर्शनं असतांही, कांय त्यांची एकमेकांवर प्रीति!)
पण तुझी आई चांगली आहे?

अंतिक— आहा! महाराज! जर तुम्ही तिला ओळखीत असतां!

राजा— मी तिजशीं ओळख करीन; पण ती तुला कशी वाटते तें सांग.

अंतिक— ती अशी भली आहे, आणि अशी माझी माया करिते—

राजा— तर तिचे मुलगेही तिजसारिखे चांगले असावे. मी ऐकतों कीं, तुझा वडील भाऊ चांगला नाहीं. पण तूं—

अंतिक— (मान हालवितो) माझा भाऊ हरबाजी?

राजा— होय, मी ऐकतों कीं तो तुझे आईस फार कष्टी करितो; हें खरें?

अंतिक— आहा महाराज, मला तें बोलतां येत नाहीं. जर जमातदारांचे कानावर गोष्ट गेली तर, ते मोठे तिरसट आहेत.—

राजा— मी तुला वचन देतों, त्याळी ह्यांतलें कांहीं समजूं देणार नाहीं. बोल तूं सर्व; काय आहे तें. तुझे भावानें काय केलें?

अंतिक — त्यानें पुष्कळ ग्राईट चाळे केले. ते सगळे मला ठाऊक नाहींत; पण माझी आई त्यावर फार रागावली होती, तें मला ठाऊक आहे; त्याची आबरू झांकावी म्हणून ती फार खराबींत आली ( तो राजाजवळ जातो आणि हळूच बोलतो. ) ती म्हणाली कीं, तितक्याकरितां नसतें, तर तो केव्हांच चाकरींतून हांकून दिला असता.

राजा — हांकून दिला असता? कशाकरितां?

अंतिक — आहा, महाराज, माझ्यानें तें सांगवत नाहीं.

राजा — काय मला?

अंतिक — तिनें मला देखील समजूं दिलें नाहीं.

राजा — (हंसतो) तें तिनें नीट केलें. पण त्यां आपणाकरितां कधीं घड्याळाविषयीं आईस लिहिलें होतें?

अंतिक — एकच वेळ.

राजा — तेव्हां ती तुजवर रागें भरली नव्हे?

अंतिक — नाहीं, नाहीं, महाराज, तिनें मला उलटें लिहिलें कीं, मी कसें ही करून माझें सामर्थ्य चालेपर्यंत, तुजकरितां एक विकत घेईन. तिला मीं लिहिलें म्हणून त्याची मला रंजी होते आतां; कांकीं तिनें

अंतिक.

पोट भरावयाची भ्रांत आहे. तिची अवस्था पाहून मी फार दुःखी आहें.

राजा— त्वां दुःखी असावेंच. चांगले लेंकानें आईवर खर्च घालूं नये. त्यानें तिला साहित्य करावें; हा त्याचा स्वधर्म होय. घडयाळाचीच गोष्ट आहे तर तुला तें कोणीही देईल. (तो पैशांची पिशवी बाहेर काढितो.) धर, घे, ह्या बारा मोहरा; ह्या मीं तुला इनाम केल्या, तुझा हात कर पुढें.

अंतिक— (हात पुढें करितो, राजा त्याजवर मोहरा मोजून घालितो.) महाराज, ह्या काय मला?

राजा— होय तुलाच, पण खरें सांग, तूं ह्यांचें काय करशील?

अंतिक— इतक्यांचें घडयाळ येईल नव्हे?

राजा— येईल पण चांगलें. पण तुला घडयाळाचें अगत्यच नाहीं; येथें तीं पुष्कळ आहेत. (अंतिक आशाभरीत त्याकडे पाहातो.) मीं तुझे जागीं असतों तर ह्या पैशांचा मी कांहीं चांगला उपयोग करितों. असो, तुझे मर्जीस येईल तें तूं कर. मी जातों नित्यकृत्यास: पण परत येईंतों तूं येथेंच ऐस. (राजा चालूं लागतो.)

अंतिक — (त्यास हाक मारितो.) महाराज!

राजा — कां? तुला काय पाहिजे?

अंतिक — माझी आई शहरांत आली असावी. ती आज सकाळीं येणार होती. मी तिला भेटून येऊं? (फुसलावितो) महाराज मला रजा देतील?

राजा — नाहीं मुला, कांहीं प्रयोजन नाहीं; तुझी आई तुजकडे येईल, तुला ती येथेंच भेटेल; अमळ धीर धर (तो जातो.)

---

## प्रवेश ८.

## अंतिक.

ती येथें येईल? ती मला येथेंच भेटेल? ह्याचें कारण काय बरें असेल? असो काय असेल तें; मला भेटीशीं कारण. एक, दोन, तीन, चार, (मोहरा मोजतो.) बारा मोहरा! घड्याळ घ्यावयास! काय मी दैववान्! मला वाटतें कीं, तें ह्यावेळेस माझे हातांत आहे, टुण टुण वाजतें तें मला ऐकूं येतें; मी त्यास किल्ली फिरवितों आहे पण राजानें सां-

# अंतिक

गितलें कीं, मी तुझे जागीं असतों तर ह्या पैशांचा कांहीं चांगला उपयोग करितों, ह्याचा काय बरें अर्थ असेल? तो काय करता? होय! त्यांकडे घड्याळांची वाण नाहीं, म्हणून त्याला त्याची नवाई वाटत नाहीं. बरें, पण त्यानें मला आणखी ही सांगितलें कीं, चांगले लेंकानें आईस साहित्य करावें. निश्चांन, त्यानें हें आमचे प्रकरणींच म्हटलें. इतक्या मोहरा माझे आईकडे असल्या तर, तिला फार उपयोगीं पडतील नव्हे? (तो दोहों हातांत चेपून मोहरा उराशीं नेतो.) घड्याळ घेऊं कीं आईस देऊं? नाहीं, घड्याळच घ्यावें; तर आईकडेही पाहावें! आणि अशा ममताळू आईकडे तर, अगत्यानें! तिनें काल मला पत्र पाठविलें त्यांत ती लिहिते कीं, मोठे विपत्तींत आहें. तिला हे पैसे दिले असतां काय आनंद होईल! एकदांच तिचें संकट दूर होईल! तर काय मी हे तिजकरितां आपणास नाहींसे करूं? (निश्चय करितो.) होय, त्यां करावेच. पण ती आतां लवकर आली तर बरें; नाहीं तर माझी बुद्धि एखादी फिरेल. मला घड्याळाच्या ही ध्यास आहे! चुप

चुप्, कोणी येतें आहे.

---

## प्रवेश १,

### सगुणाबाई, दलपतराव, आणि अंतिक

अंतिक— (आईस भेटावयास धांवतो.) काय! तूं, माझे वये!

सगु०— (मुलाकडे लक्ष्य न देतां संभ्रांत आसपास पाहाते.) मला समजत नाहीं; पण मी मोठी चिंतेंत आहें, भाऊ. राजेसाहेबांनीं मला कां बोलाविलें असेल बरें?

दलपत०— हा मुलगा पाहा; त्यास ते तुझे स्वाधीन करणार. (ती साश्चर्य सचिंत मुलाकडे पाहाते, तो आनंदानें तिच्या गळ्यास झोंबतो.) पाहिल्या अर्थीं त्याला येथें आणणें हा वेडेपणा; राजांनीं त्यास काय करावें? दुसरीं मुलें वाढतील आणि रोजगारास चढतील; पण हें (अनादरानें) असें खुजट पोर आहे कीं, कोणतेही उपयोगीं पडावें नलगे. हा तुझें दुःखानें दूध प्याला आहे, म्हणून असा झाला म-

# अंतिक.

ला वाटतें. हें झाड मुळासच रोगटलें; त्याला शक्ति याची नलगे, हा वादाधा नलगे.

सगु०.— (खेद पावून.) आहा, भाऊ! दैव माझें!

दलप०— तर, राजेसाहेबांकडे तूं त्याविषयीं प्रार्थना करूं नकोहो; करून फळ नाहीं. वडिलाकरितां दांवें तर कांहीं बोल; तो कांहीं तरी मनुष्यसा दिसतो.

सगु०— वडिलाविषयीं?

दलप०— होय, त्यालाही बलावूं पाठविलें आहे.

सगु० — भाऊ, तूं मला भय घालितोस. त्याचे गुण राजेसाहेबांस समजले?

दलप०— (अनास्थेनें) असतील, कां नसमजावे? (नाक मुरडतो, आणि उदासीनपणा दाखवितो.) त्यानें लोकांची उचापत फार काढिली आहे; आणि त्यास कांहीं दिवशीं लश्करांतून पळून जावें लागेल, किंवा बंदीखान्यांत बसावें लागेल. हें राजास समजलें तर कसें होईल? आणि हें सगळें येणार मजवर— (तापून.) तूं पाहा कीं, माझी भलाईच मला नडते आहे; आणि मलां वाटतें कीं, त्यांकरितां मला पाहा ण्यांत जावयाचें पडेल. मी तुझे पोरांचे ग्वटल्यांत पडलों नसतों तर बरें होतें. असो, पण अनंतःपर पड-

णार नाहीं. (तो चडफडत चडफडत पुढें जातो मा-
गें येतो.) नाहीं, माझे कुडींत प्राण आहेपर्यंत मी
अतःपर तुझे पोरांचें नांव घेणार नाहीं.

(तो जातो.)

---

## प्रवेश १०,

### सगुणाबाई आणि अंतिक.

अंतिक — (तिला चिंतेंत पाहून) मामाचा सदा तापट स्वभाव, बोलूंदे त्याला बये, तूं कांहीं चिंता करूं नको.

सगु॰ — तूं उगीच ऐस मुला, तुला समजत नाहीं.

अंतिक — ओहो! मला मामापेक्षां अधिक समजतें. तो म्हणतो तसे राजेसाहेब नाहींत, ते कोणास उपद्रव करावयाचे नाहींत. त्याचा दाखला हा पाहा; पाहा लागलाच. (हातांतल्या बारा मोहरा दाखवितो.) पाहा ह्या सगळ्या त्यांनीं मला दिल्या.

सगु॰ — (आश्चर्य पावून,) राजेसाहेबांनीं? असें कसें होईल?

# अंतिक.

अंतिक— त्यांनीं एका मोठ्या पिशवींतून काढिल्या. ती सगळी मोहरांनीं भरली होती; आणि तूं यावयाचे अगोदर नुकत्याच मला दिल्या. आई, जर त्यांची इच्छा झाली, जर त्यांची कृपादृष्टि झाली, तर मग काय! ते मातबर आहेत; आपणांस अमर करून सोडतील.

सगु०— पण हें कसें झालें? मला समजत नाहीं. त्यांनीं कांहीं योजून दिल्या असतील.

अंतिक— ह्यांत भ्यांत काय? त्यांचें घड्याळ बंद झालें होतें; ते काल सगळा दिवस शिकारीस गेले होते; ते त्यास किल्ली यावयास विसरले; आणि आज प्रातःकाळीं (तो खोलीकडे जातो आणि दार उघडितो.) ती पहा, ती जागा. राजेसाहेबांची निजावयाची; त्यांनीं मला तेथें बोलाविलें, आणि म्हटलें, "मुला, तुझे घड्याळांत किती रात्र राहिली आहे तें पाहा," माझेजवळ घड्याळ नव्हतें.—

सगु०— म्हणून त्यांनीं तुला हे पैसे दिले?

अंतिक— होय; त्यांनीं घड्याळ विकत घ्यावयास दिले. (फिरून मोहरा दाखवितो.) ह्या बघ बारा मोहरा.

सगु०— मजकडे पाहातोस काय? मी तुझें खरें मानणार नाहीं.

अंतिक— कां? पण मला घडयाळाची उतावीळ नाहीं; तें मीं कधींही घेतलें तरी कामास येईल. (आईचा हात घेतो.) तूं घे ह्या बये, आपले जवळ ठेव.

सगु०— (हुंदका येऊन) काय! माझ्या जिवा, असें आहे!

अंतिक— बये, तूं सदा रडतेस, तें मला वाईट वाटतें. आहा! मजपाशीं पुष्कळ पैसे असते तर बरें होतें! मग मी तुला कधीं रडूं देतों ना. सगळे, होय, दमडीनदमडी मी तुझे स्वाधीन करितों.

सगु०— (त्यावर झेंपते.) काय तूं तसें करितास? खरेंच?

अंतिक— तुला संतोषांत पाहून मला फार आनंद होतो.

सगु०— (त्याचा मुका घेते.) तुझी वासना पाहून, मुला, मी सुखी झालें. राजेसाहेबांनीं आपली सगळी दौलत जरी मला दिली, तरी ह्या वेळचे आनंदाचें मोल होणार नाहीं.— मुला, तुला अनुभव नाहीं; मजसारिखी हीनभाग्याची आई आहे तिला, मुला·

# अंतिक.

ची आपलेविषयीं करुणा पाहून, किती समाधान होतें तें!

अंतिक — (तो तिचा हात फिरून धरितो.) तूं हे पैसे घे, पण मी तुला विनंती करितों कीं, नाहीं म्हणूं नको —

सगु० — होय मुला, मी घेतें. आणि तूं येथें असतां तुला गरज आहे, म्हणून मी तुला द्यावें —

अंतिक — मला काय तूं ह्यांचें घड्याळ घेणार?

सगु० — तूं राजेसाहेबांपाशीं आहेस; तुजजवळ एक असावें.

अंतिक — मला त्याची कांहीं गरज नाहीं. राजेसाहेबां चे दूर खोलींत घड्याळें आहेत. त्यांनीं मला स्वतां सांगितलें कीं, घड्याळावांचून तुझें कांहीं अडणार नाहीं.

सगु० — पण त्यांनीं तुला घड्याळाकरितां पैसे दिले नव्हेत?

अंतिक — असें ते बोलले, इतकेंच.

सगु० — तर मला दिसतें, तूं मला ठकवितोस; तूं माझे ममतेमुळें एकादी लबाडी करीत असशील.

अंतिक — लबाडी! तर तुला माझें खरें वाटत नाहीं?

' ह्यावेळेस येथें राजेसाहेब असते, तर तुझा समज- लें असतें. आहा! ते लवकर येतील तर बरें. (मा- गें फिरून पाहातो.) हे, तेच स्वतां आले. आतां पा- हा बरें. —



## प्रवेश ११,

राजा, सगुणाबाई, आणि अंतिक.

अंतिक — (राजाचे समोर जातो.) बरें, हें खरें कीं नाहीं, महाराज? तुम्हीं मला बारा मोहरा दिल्या? पहिल्यानें घड्याळ घ्यावयास?

राजा — होय, माझे लाहाने माणसा.

अंतिक — आणि मग, तुला घड्याळावांचून अडचण नाहीं, हें ही तुम्हीं नाहीं सांगितलें?

राजा — तेंही खरेंच.

अंतिक — (लागलाच आईकडे फिरून.) पाहा बये, आतां कसें?

सगु॰ — (घाबरी होऊन) महाराज, हें मुलगें अज्ञान;

अंतिक.

सुरळभांवानें बोलतें. मर्यादा कशी ठेवावी तें ह्यास समजत नाहीं, ह्याची क्षमा असावी.

राजा— क्षमा! वाई, मला सरळपणा फार आवडतो; असा सर्वांस असता तर काय नव्हतें. वास्तवीक असेंच सर्व असावे. मुला, मला वाटतें तुझे आईस तुझें खरें वाटलें नाहीं?

अंतिक— (अमळ सचिंत) नाहीं, महाराज, पहिल्यानें तिला खरें वाटलें नाहीं; मी तिला मोहरा देत असतां ती घेईना.

राजा— ती घेईना, हें त्वां काय म्हटलें? तर काय तुझे दृष्टींत माझें बक्षीस हलकें दिसलें, म्हणून तूं दुसऱ्यास देऊं लागलास? असें होणार नाहीं.

अंतिक— (कांचावतो.) महाराज.—

राजा— मला जर असें आधीं समजतें तर मी तुला देतोंना. खरेंच सांग, त्वां असें केलें काय?

अंतिक— (आईकडे बोट करितो.) आहा, महाराज; माझी आई फार गरीब आहे!

राजा— (त्याची हनुवटी धरितो.) भले बाळा! तर त्वां आपले गरीब आईची कींव जाणून घडयाळाची आशा सोडिली? तिला साहित्य करून घडयाळ

गमावणें, हें तुला फार अवघड पडलें असेल नव्हे ?

(तो आपलें घड्याळ बाहेर काढितो.) हें घे; ह्या वेळेस हें एकच जरी मजकडे असतें, तरी मीं तुला दिलें असतें.

अंतिक— (आनंदानें घेतो.) आहा! महाराज! पण हें चालतें आहे ना?

राजा— भिऊं नको, चांगलें चालतें. (अंतिक आईकडे धांवतो तें दाखवावयास.) शाबास मुला, मी तुला दिलें होतें त्याचें त्वां चांगलें सार्थक्य केलें. (त्यास मोहरांची पिशवी देतो.) ही घे, हींत शंभर मोहरा आहेत; ह्या मीं तुला बक्षीस केल्या

अंतिक— (त्यांकडे साश्चर्य पाहातो.) महाराज, हें काय!

राजा— तूं अनमान करितोस? घे ह्या

अंतिक— काय, सगळी पिशवी! (परत द्यावयास करितो.) महाराज, हें फार आहे.

राजा— होय, तुला फार खरेंच. पण मी ह्यासाठीं देतों कीं, त्वां ह्यांचा चांगला उपयोग करावा. बरें ह्याचा बहूत उपयोग कोणास आहे?

अंतिक— बहूत उपयोग कोणास आहे? (तो राजाकडे आणि आईकडे पाळीपाळीनें पाहातो.) ह्या

# अंतिक.

घे आई, तुला

सगु० — (राजापुढें येते.), महाराजांचा मजवर फार—

राजा — उपकार मानावयाचें कांहीं कारण नाहीं, हें मीं थोडें दिलें, मला वाटतें कीं, इतक्यांत तुमचें संकट दूर होणार नाहीं. पण, बाई (मुलाकडे हांत करितो.) हा मुलगा माझे चाकरीस फार लाहान आहे, माझे उपयोगीं नाहीं, म्हणून मी त्यास परत करितों; त्याचें तुम्हांला वाईट वाटूं नये. कां, तुम्हीं बोलत नाहीं?

सगु० — महाराजांनीं क्षमा करावी:—

राजा — काय?

सगु० — माझें दरिद्र पाहून मला लज्जा होते; त्याला मी परत नेऊन काय करूं? मला त्याचें पोषण कसें होईल? मी त्यावर आशा फार धरिली होती. आतां मी पुनः भव जालांत पडलें. मी आतां प्राणधारण कसें करीन? (रडूं आटोपते.) हा फार लाहान; त्यास बाप नाहीं; पुढें त्याचा परिणाम, कसा होईल? महाराज, मी अल्पबुद्धि, बोललें त्याची क्षमा असावी.

अंतिक — (रंजीस होऊन राजाचा हात धरितो.) महाराज, बघे रडते.

राजा— तूं आपले आईपाशीं राहातोसना?.

अंतिक.—(आर्जवानें.) महाराज, तर आपण मला घु रीं लावून देतां?

राजा— तूं जावयास राजी नाहींस? बरें तर, बाई, अ- सूया त्याला मजकडे. पण येथें राहून त्याचें कसें हो- ईल? हा कदाचित् बिघडेल; असो; पण त्याचें म- ला भय वाटत नाहीं.

सगु॰— हा बिघडेल! (मुलाकडे डोळे लावित.) हा बि- घडेल, आपण म्हणतां महाराज!

राजा— नाहीं? हा बिघडणार नाहीं?

सगु॰—(सभय) महाराज, मी आपला अभिप्राय चां- गला समजलें नाहीं, म्हणून माझे निर्भीडतेची क्षमा असावी.

राजा— माझा अभिप्राय असा कीं, माझे दुसरे अंतिक आहेत, त्यांचे गुण चांगले नाहींत; हा त्यांचे सो- बतीनें बिघडूं शके. पण अनुभवून पाहूं या—

सगु॰—(मुलाचा हात धरिते.) नाहीं महाराज, हा त- सा नाहीं.

राजा— पण पाहा; त्याचा दूरवर विचार करा—

सगु॰— त्याविषयीं मला भ्रांतच नाहीं. त्याला कोठेंही

# अंतिक

असूया.

राजा— पण विद्याभ्यासायांचून ह्याचें कसें होईल?

सगु॰— भगवान् काय करील तें खरें; त्याला शरण आहें. जर हा परिश्रम करून उदयास येणार नाहीं, तर मजुरी करील, दरिद्र भोगील; पण ह्यानें दुराचरणी मात्र होऊं नये, इतकी माझी इच्छा आहे.

राजा— बाई, तुमचा थोरपणा पाहून मला संतोष झाला. तुम्हांस सर्व गोष्टीनें साहित्य करावें, हें मला योग्य आहे. (मोठे आवडीनें) तुमची काय इच्छा आहे? कोणत्या गोष्टीनें मी तुमचें प्रिय करीन? मोकळें मन करून बोला. मी तुमचा मित्र आहें, शंकूं नका.

सगु॰— (सद्गदित होऊन.) मी तुमची कशी उतराई होईन?

राजा— तुमची अवस्था काय आहे? तुमची मालमत्ता काय आहे तें मला सर्व सांगा.

सगु॰— माझी मालमत्ता जी आहे ती आतां माझी नव्हे.

राजा— तर मला वाटतें तुम्हांवर फार कर्ज आहे. सरकारांत तुमची कांहीं पंचाईत चालली आहे, असें मी ऐकतों; त्याचें कसें काय आहे?

सगु॰ — महाराज, एक कज्जा माझे इनाम गांवाचा आहे, तो केव्हांच चुकावा; पण मजकडे पैका नाहीं, मला कोणाचा आश्रय नाहीं. तो घरांत समजावा म्हणून मी आलें होतें, पण तसें होत नाहीं.

राजा — बरें तर तें कांहीं वाईट झालें नाहीं, तुमचा इनसाफ आतां वाजवी होईल; माझें वचन घ्या. आणखी मी तुम्हांस एक हजार रुपयांचें स्वास्थ्य करून देतों. मला वाटतें कीं, मग तुमच्या सर्व अडचणी दूर होतील.

सगु॰ — (लोटांगण घालिते.) मज हतभाग्येवर इतकी कृपा!

राजा — (तिला उठवितो.) काय तुम्ही करितां हें बाई; मी तुम्हांस प्रार्थितों कीं उठा. तुमचे भ्रताराने जी सरकारचाकरी बजाविली होती ती पाहिली असतां मी हें करितों हें फार थोडें आहे. सांगा मला आतां, तुम्ही मुलास परत न्याल कीं नाहीं?

सगु॰ — महाराज, हे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं.

राजा — आणि मुला, तूं आतां आईपाशीं जाशील कीं नाहीं?

## अंतिक.

अंतिक— ( घड्याळांशीं खेळतो. ) आईपाशीं ? होय महाराज.

राजा— तूं मजकडे राहात नाहींस तर ?

अंतिक— बरें तर, जशी महाराजांची मर्जी.

राजा— तर; जर मी आतां तुला आईकडे लाविलें, तर तूं मजपाशीं नाहींसा होशील नव्हे ? आणि तुझी तर इच्छा आहे कीं, मजपाशीं असावें; आणि तुझे आईची ही तशीच इच्छा आहे. असो, मला कांहीं दुसरा प्रकार केला पाहिजे. बाई, तुम्ही येथें असा, मी हाच आलों.



## प्रवेश १२,

### सगुणाबाई आणि अंतिक

सगु०— ( बांकावर बसते. ) आहा ! काय सुदीन हा ! काय अकल्पित सुख हें !

अंतिक— कां आई ? कां ? तूं आतां खुशाल्लीस ना ?

सगु०— ( त्यांस जवळ घेते. ) अगा माझे जिवलगा, माझे परमप्रिया मुला !

अंतिक— पण तुला फार हर्ष झाला असें मला दिसत नाहीं. तुला फार आनंद व्हावा असें मी इच्छितों.

सगु०— बाळा, मला आतां मोठी लज्जा होते, कांकीं, मी भगवंतास शब्द लावीत होतें. तूं झालास तसेंच तुझे बापाचें वर्तमान आलें; तेव्हां मी तुला टाकलें, आणि तूं कशास जन्मलास म्हणून तुला शब्द ठेविला; ( ती त्याला आलिंगिते आणि त्याचा मुका घेते.) आणि त्याच तुझे हातून मी आज सर्व संकटांतून मोकळी झालें! त्वां आज माझीं आसवें आटिलीं! हे भगवान्, आतां मी आणखी कसची वांच्छा करूं? मी परिपूर्ण झालें. मला कांहीं अपेक्षा राहिली नाहीं. पण एक तेवढें तुझे भावाचें दुःख मात्र मला उणें आहे; मग माझें सर्व नीट झालें.

अंतिक— माझे भावाचें, कां? त्याचें काय आहे?

सगु०— जर राजेसाहेबांस त्याचे गुण समजले तर—

अंतिक— त्यांना समजले तरी त्याचें काय होणार आहे? त्वां पाहिलें नाहीं; ते काय रूपाळू, काय थोर आहेत ते!

सगु०— खरें, पण आपणावर, कांकीं आपण त्यांचा कांहीं अपराध केला नाहीं.

# अंतिक.

अंतिक— पण त्यांनीं मला वचन दिलें आहे कीं; मी को- णापाशीं सांगणार नाहीं.

सगु॰— (भ्याली) काय! त्यांनी तुला वचन दिलें आहे! कसचें?

अंतिक— होय खरेंच, म्हणून तूं भिऊं नको.

सगु॰— मी थरकतें, त्वां त्यास सांगितलें तर?

अंतिक— नाहीं; सांगितलें म्हणशील तर कांहीं सांगि- तलें; मला ठाऊक होतें तितकें मात्र सांगितलें. मग त्यांनीं मला त्याचें आचरण पुसलें; तें मी काय उ- गीच खोटें सांगूं? तुला ठाऊक आहे कीं, त्वां मला खोटें सांगावयाची मनाई केली आहे.

सगु॰— पण, मुला हें काय केलें!

अंतिक— कां बये, तूं चिंता कां करितेस?

सगु॰— अरे, चिंता कां करितेस, म्हणून आणखी पुसतो- स! जर राजांनीं आणखी चौकशी केली, आणि जर त्यांस तें समजलें, तर मग तुझे आईची आणि तुझे भावाची धडगत नाहीं.

अंतिक— (ती रडूं लागते.) धडगत नाहीं!

सगु॰— चुप: कोणी येतें आहे. (ती त्याचें चुंबन करिते आणि त्यास अवसान देते.) एक शब्द बोलूं नको,

डोळे पूस. तुला रडतां पाहिलें तर एकादा घात होईल, चिंता करूं नको.

---

## प्रवेश १३,

## सगुणाबाई, अंतिक, राजा, दलपतराव, आणि हरबाजीराव.

राजा — या राव, आंत यावें. (हरबाजीरावास.) रणधीररावांचे पुत्र हरबाजी नाईक गाडदी ते आपणच काय?

हर० — (फार लवून.) होय, महाराज.

राजा — योग्य, तुमचे तीर्थरूप बहूत सज्जन, आणि मोठे शूर होते. माझी खातरी आहे कीं, तुम्हीं ही त्यांची चाल धरली असेल; आणि तेणेंकरून तुम्ही त्यांचे पुत्र साजां असें करीत असाल.

हर० — महाराज, तसें म्यां करावें, हें मला योग्य आहे.

राजा — खरेंच, तुम्ही योग्य आहां त्यांपक्षीं योग्य असेल तेंच कराल. ही पाहा तुमची आई, हिचे गुण,

# अंतिक.

आणि ह्या मुलाचें शुभलक्षण पाहून तुमचें कुटुंब च थोर आहे, असें माझे बुद्धीस आलें; आणि मला वाटलें कीं, तुम्हा सर्वांस एके ठिकाणीं पाहावें; म्हणून येथें पाचारून आणिलें आहे.

हर० — (आणखी लवतो अमळ डोलानें.) महाराजांनीं ही आज मला मोठी आंबरू दिली!

राजा — तुम्हांस योग्य आहे, त्यापेक्षां मीं कांहीं अधिक केलें नाहीं.

हर० — महाराज मला आपलें कृपापात्र करितात.

राजा — खरेंच, तुम्हांस भाग्यास चढवावें, अशी माझी फार इच्छा आहे; परंतु तुमचें स्वरूप माझे बुद्धीस आलें आहे, तसेंच वास्तवीक आहे, अशी माझी खातरी झाली पाहिजे; कांकीं, तुमचे निस्पृहपणाचे बोलण्याचा, व तुमचे मोढीचा डौल पाहून—

हर० — आहा! महाराज, धन्य मी!

राजा — ह्यावरून मला वाटतें कीं, एक तर तुम्ही बहुत थोर असाल, किंवा बहूत वाईट मनुष्य असाल; परंतु अशा आईबापांच्या पोटीं आणी कसा पुत्र होणार नाहीं; नाहींच वरें तर ह्यासमयीं मीं तुमची काय सेवा करावी, तुम्हांस एक पायरीवर चढविलें तर त्यानें

तुमची योग्यता फार वाढेल असें कांहीं दिसत नाहीं; बरें तुम्हांस कसें वाटतें?

हर०—(अमळ विचार करून.) खरें, महाराज.

राजा—बरें एक पायरी टाकून दुसरे पायरीस चढविलें असतां तुम्ही जमातदार, मात्र व्हाल; शंभर मनुष्यांवर सर! त्यांतही कांहीं विशेष नाहीं. पण प्रथम, (दलपतरावांकडे फिरतो.) राव, तुमचे भाच्याचे योग्यतेविषयीं तुमचें काय मत आहे?

दलप०—(अमळ गोंधळून.) माझें महाराज? माझें मत?

राजा—ह्या भाषणावरून विपरीत असावें मा भास होतो.

दलप०—नाहीं महाराज, फार स्फपरीत आहे; मला वाटतें कीं, हा हिंमती आहे; आणि पुढें शूर निपजेल.

राजा—(हरबाजीस तोषितासारिखा पाहातो.) काय हो? हें खरें?

दलप०—आणखी हा स्वरूपानेंही फांकडा दिसतो.

राजा—होय, हा चांगला जवान आहे हें मला प्रत्यक्ष दिसतें. पण त्याचें आचरण, त्याची रीति कशी? तु-

# अंतिक.

म्हांला असल्या हलक्या गोष्टी विचारावयास मला लाज वाटते, पण मुख्यत्वेंकरून हा कोणते प्रकारचा मनुष्य आहे तें मला समजलें पाहिजे.

दलप० — (हंसून.) अमळसा रंगिला; कोणे समयीं अमळसा धट्ट ही. पण महाराज, हां शिपायास दूषणें नव्हत.

राजा — खरेंच? मला हें आजपर्यंत समजलें नव्हतें. आतां, बाई, मला तुमची साक्ष मात्र पाहिजे. तुम्ही त्याविषयीं काय म्हणतां? — (अमळ विसांवून) कांहीं नाहीं मला वाटतें.

सगु० — मीं त्याविषयीं काय सांगावें, महाराज?

राजा — काय तुम्हांस दिसत असेल तें, खरेंच सांगा.

सगु० — पण महाराज, मला तें सांगवेल? जर मला त्याची प्रशंसा कर्तव्य असली, ती मीं त्याचे समक्ष केली, तर महाराजांस मानेल? अथवा जे त्याचे आचरणाप्रमाणें त्यास फळ तत्काळ देऊं शकतात, अशांजवळ मला त्याची वांकडी गोष्ट बोलवेल?

राजा — (हंसून) बाई, तुम्ही मोठ्या फक्कड आहां. त्या उत्तरांत तुम्हीं आईचा कनवाळूपणा राखून

बापकोचा भीरुपणा दाखविला, तुमची प्रशंसा मी कशी न करूं? (हरबाजीस अमळ गंभीरवाणीनें) रावजी, एकएकाची चाल निरनिराळी असते; तशी माझी ही आहे. कोणास वाढवावें असें माझे मनांत आलें, म्हणजे मी पहिल्यानें त्यास पाहाण्यांत देत असतों, हें तुम्हांस कसें दिसतें बरें?

हर०—(भिऊन आणि घाबरून.) महाराज! हें हें हें—

राजा—होय, माझी चाल अशीच आहे. तुझी नरबार दलपतरावां स्वाधीन कर, तुझे ठायीं मला अमळ संकोच आटळला असता तर इतकें होतें ना. पण अहंकार! हा बोलण्यांत धीटपणा! आपण दुर्गुणी आहों, हें आपले मनांत समजून ही जो अशीं भरंवशाचीं बोलणीं बोलतो, त्या मनुष्यापासून कसची आशा धरावी? त्या मनुष्यानें मला राग आणिला असें कोणास वाटेल? त्या मनुष्यानें आपले महा थोर आईस त्याप्रमाणें गांजलें असें कोणी मानील? इतकें करून ही पुनः—(रागानें) घालाहो ह्याला एक महिना बंदीखान्यांत. बाई, खरेंच सांगतों, तुम्हांकरितां मी ह्यानें कांहीं अधिक म-

# अंतिक

नास आणिलें नाहीं; एरवीं ज्या गोष्टी माझे कानीं आल्या आहेत, त्यांवरून मला दिसून येतें कीं, हा महान् अपराधी आहे. (रोषयुक्त आणि तीव्र वाणीनें.) दलपतराव, ह्या उपर ह्याचें कांहीं वांकडें आचरण आढळलें असतां, मला तत्काळ कळवा—समजलां? त्याक्षणीं मी पुढें ह्यास योग्य वेस चढविणार आहें, म्हणून (दलपतरावांकडे पाहून.) दलपतराव, तुम्हीं अथवा (नम्र वाणीनें) बाई, तुम्हीं मजकडे ह्यासमयीं ह्याची रदबदली करूं नये. ह्याला कोणतेही मिषानें कांहीं देऊं नये. ह्याला हावा असला तर ह्यानें आपले रोजमुऱ्यांत खर्च चालवावा. (बोटानें सूचना करितो.) आतां जावें राव आपले बंदीशाळेंत. (दलपतराव आणि हरबाजी जातात.)



## प्रवेश १४,

### राजा, सगुणाबाई, आणि अंतिक.

राजा — कां बाई, तुम्ही कष्टीश्या दिसतां?

सगु० — महाराज! मी आई आहें.

राजा — पण तुम्हीं इतर अज्ञान आयांसारखी आई नव्हां, ज्या मुलाला अमळ दुःख होईल म्हणून त्यास शिक्षा करीत नाहींत.

सगु० — अशी ममता करितात ती खोटी ममता. पण मला चिंता इतकीच कीं, तो आतां जन्मवर महाराजांचे कृपेंतून गेला असें नव्हावें.

राजा— त्याविषयीं तुम्ही काळजी करूं नका; माझे मनांत इतकेंचकीं, मी त्यावर जे पुढें उपकार करणार त्यांस त्यानें योग्य व्हावें, आणि त्याचे वयाकडे ही कांहीं पाहिलें पाहिजे; म्हणून मी त्यास झालेले अपराध क्षमा करीन पण असें सदा करणार नाहीं. पाहूं या, कसें होतें तें. एका यास पश्चात्ताप होऊन तो ठिकाणा येतो, एकादा उलटा अधिक बिघडतो. पण कसेंही होवो, तुम्हीं स्वस्थ असावें. मला वाटतें आतां तुमचा मुलगा मार्गावर येईल, आणि तो जसजसा सुधारेल त-

अंतिक

सतशी मी त्याजवर कृपा करीन. (अंतिककडे व-
ळून.) त्या मुलाविषयीं तुम्ही जाणतां मीं काय यो-
जिलें आहे तें?

सगु० — तें जें कांहीं असेल तें त्याचे कल्याणार्थच असे-
ल. महाराज, आपला थोरपणा ऐकून, आपलें क-
ल्याणचिंतन केल्यांवांचून माझा एक दिवसही रि-
कामा गेला नाहीं. पण आपले गुण आज प्रत्यक्ष
पाहून मला वाटलें कीं, मीं आपलें स्वरूप कांहींच
ओळखिलें नाहीं.

राजा — तुम्हांस ठाऊक आहे? मी इच्छितों कीं, त्याला
माझे राज्याचा स्तंभ, माझा विश्वासू सेवक, आणि
मुलांचा मित्र करून ठेवावें, कीं जो एकादे दिवशीं प्र-
संग पडला असतां, आपले बापाप्रमाणें राज्याचे क-
ल्याणार्थ प्राण खर्चे करील.

---

प्रवेश १५,

राजा, सगुणाबाई, अंतिक, आणि खिजमद्‌गार.

खिज० — महाराज, विनंती आहे, बाहेर कुनशाले यार
आले आहेत.

राजा— त्यास अंत पडूं दे. बाई, माझे मनांत आहे तें मी आतां तुमचे समक्ष करितों, तुम्हांला तें रुचावें म्हणून.

---

## प्रवेश १६,

### राजा, सगुणाबाई, अतिक, आणि राजशाळागुरु.

गुरु—(नमतो) महाराजांची आज्ञा ऐकावयास सिद्ध आहें.

राजा— बहुत संतोष झाला. बलाविलें होतें इतक्या करितां कीं, राजशाळेंत थोरांचीं मुलें तुम्हांस काय देत असतात?

गुरु— थोरांचीं मुलें महाराज? तें आईबापांचे थोरपणावर आहे.

राजा— असो, पण तुम्ही काय घ्याल तें सांगा.

गुरु— साहाशें रुपये वर्षास. महाराजांची आज्ञा झाल्यास.

राजा— बरें तर, हा मुलगा तुमचे स्वाधीन करावयास मी इच्छितों. त्यास बाप नाहीं, म्हणून मी त्यास बापाचे जागीं झालों आहें, त्या अर्थी त्यास जें पाहिजे तें सर्व मी देईन. पण प्रथम मला सांगा कीं, मुलांचे चौकशीवर कोण असतो; कांकीं तें मुख्यत्वें पाहिलें पा-

# अंतिक

हिजे.

गुरु — वेगवेगळाले उपगुरु आहेत.

राजा — तें, मला वाटतें कीं, आपआपले कामास योग्यच असतील; पण मी त्यांस ओळखीत नाहीं. माझा सर्व भरंवसा तुम्हांवर आहे. तुम्हीं माझे खातरीस उतरलां आहां, म्हणून कृपा करून तुम्हीं स्वतां त्या मुलाचें सर्व पाहावें.

गुरु — जशी आज्ञा.

राजा — मी आज्ञा म्हणून नाहीं सांगत; तुम्हीं संतोषानें हें कबूल करावें.

गुरु — महाराजांची ज्यांत संतोष तें म्यां करावें, त्यांतच माझें कल्याण.

राजा — मी तुमचा उपकारी होईन. (अंतिकास कानीं धरून,) माझे मुला ये, हे गुरु पाहिलेना? हे बहुत शांत आणि सज्जन आहेत; तूं ह्यांच्या संगातीं जाऊन त्यांकडे राहा, आणि चांगला विद्याभ्यास कर.

अंतिक — (पळभर गुरूचे तोंडाकडे पाहून,) महाराज.

राजा — पण हे तुझे धनी, हे तुझे हितकर्ते, असें

तूं त्यांस मान, त्यांचे वचनाबाहेर चालूं नको. त्यांची मोठी मर्यादा ठेव. आणि जर का त्यांनीं तुझी फिर्याद केली—

अंतिक— त्याविषयीं महाराजांनीं निश्चिंत असावें.

राजा— कांकीं, आतांच तुझे दृष्टीस पडलें कीं, मी जसा गुणवानास चांगला, तसाच दुर्गुण्यास वाईट आहें. तुझा इवला बोभाटा ऐकिला असतां— हो.

अंतिक— (मोठे नम्रतेनें गुरूस नमतो.) गुरुजी तुम्ही मजवर रागावाल असें मी कधीं करणार नाहीं.

राजा— हें मुलगें तुम्हांस कसें वाटतें?

गुरु— महाराज, आपला वरद हस्त ज्याचे माथीं, त्यास काय पाहावयाचें आहे? मी त्याला आपल्या मुलाप्रमाणें वागवीन.

राजा— बरें तर; त्याला घेऊन जा. बाई, त्या गोष्टीची तुम्हांस कांहीं अडचण नाहीं म्हणून वाटतें.

मृग०— हे भगवान्! अडचण, महाराज!

राजा— जा तर, माझे प्रियकरा, आणि कधीं सदाचरणाचा, सत्कृतीचा मार्ग सोडूं नको. तुला कोणतेही गोष्टीचें मी उणें पडूं देणार नाहीं. पण तूं म-

# अंतिक.

ड्रा खिन्नसा दिसतोस ?

अंतिक— (राजाचा हात धरतो.) ईश्वर तुम्हांस सर्व करवें देवो

राजा— (कोमलतेनें) आणि तुलाही तसींच देवो; आणि तुझें कल्याण करो, माझे मित्रा. आहा! त्यानें हृदय किती दाटलें आहे! (गुम्रस,) आतां तुह्मीं त्याला घेऊन जावें. आणि बाई, तुम्हीं त्याबरोबर जावें, आणि तुमचा मुलगा राहाणार तें स्थळ पाहावें.

सगु०— (साष्टांग नमस्कार घालिते.) महाराजांचे उपकार! मी काय— (तिचा गळा दाटला, अश्रूंचे लोट चालले, बोलवत नाहीं.)

राजा— तुम्ही काय करितां हें बाई? हें मला आवडत नाहीं.

सगु०— मला हे पाप—

राजा— (तिला बळात्कारानें उठवितो.) माझे मात, तूं मला इतका थोरपणा देऊं नको. ऊठ, उभी राहा.

सगु०— (ती उठते) बरें तर, मी आतां निरोप घेतें. (पर द्यान करिते.) मी हे असे निंबा देवाकडे जाईन, आणि तुमच्याविषयीं, शेर, दीनदयाळ

त्यांचें सदा कल्याण असो म्हणून त्यापाशीं प्रार्थना करीन.

राजा — (तिन्ही बार पडते पोहोंचिवतो.) यारे बाई, तुमचें देव बरें करो.

(मग तीं सर्व निघून जातात.



# सूचना.

पूर्वी सदाशिव काशीनाथ छत्रे यांनीं हें भाषांतर केलें, हें फार चांगलें आहे. यांत व्यावहारिक भाषेच्या रीतीनें जागोजाग रस आणले आहेत, परंतु त्यांच्या रचनेंत कोंकणी शब्द फार, व कोठें कोठें दूरान्वय, व कोठें कोठें विरामचिन्हांची अव्यवस्था, व कितीएक ठिकाणीं व्याकरणाचे दोष होते, यामुळें या आवृत्तीचे वेळेस मत शोधिली. शोधितेवेळेस मूळ पुस्तक गर पाहिलें नाहीं, पण जें छापलेलें मराठी पुस्तक होतें तेंच शोधून नीट केलें. तें असें,

कोंकणी शब्द कोठें कोठें होते ते काढून देशाप्रमाणें शब्द घातले

कोठें दूरान्वित शब्द होते ते जेथील तेथें समीप केले.

विरामचिन्हें म्हणजे कामा, फुलस्टाप, इत्यादिक यांची व्यवस्था केली.

कितीएक ठिकाणीं व्याकरण दोष होते ते काढून नीट केले.

ग्रंथांत कोठें कोठें हिंदुस्थानी भाषा आली आहे ती शुद्ध नव्हती, ती हिंदुस्थानी भाषेच्या रीतीप्रमाणें नीट के-

मी शब्द वृत्तीयांत जेथें आला तेथें त्यावर अंकुस्ता देऊन मीं असें केलें, किंवा म्यां असें शब्दरूप लिहिलें.

कर्मणिप्रयोग भावप्रयोग यांची व्यवस्था व्याकरणा-

## सूचना.

त्या रीतीप्रमाणें नीट केली.

जेथें दुर्बोध शब्द होते तेथें प्रायः सुबोध शब्द घातले. ह्यांशिवाय जें न्यूनाधिक आढळलें तें नीट करून प्रत शोधिली असे.

---

## सूचना.

त्या रीतीप्रमाणें नीट केली.

जेथें दुर्बोध शब्द होते तेथें प्रायः सुबोध शब्द घातले. ह्यांशिवाय जें न्यूनाधिक आढळलें तें नीट करून प्रत शोधिली असे.